**<u>प्रशासकीय मान्यता</u>**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर्वोपचार रुग्णालय, बारामती येथे ५०० खाटाचे रुग्णालय परिसरात वसतीगृहे व निवासस्थाने इमारतीस अंतर्गत आवश्यक असणाऱ्या खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

---

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**

शासन निर्णय क्रमांक : जीसीबी-२०१९/प्र.क्र.०२/प्रशा-१

गोकुळदास तेजपाल रुगालय आवार, नवीन गो.ते.संकुल,

९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई.

दिनांक : ०८ जानेवारी, २०२०.

**वाचा :**

१) संचालनालयाचे पत्र क्र.संवैशिवसं / शावैमबारामती / फर्निचर / ११७०१ /प(आय)/११४८४/१८, दिनांक ३०/१०/२०१८.

२) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र : ससमा-२०१०/प्र.क्र.४(भाग-१)/ का-१४६१, दिनांक ११ जून, २०१८.

३) कक्ष अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग यांचे क्र.बैठक-२०१९/प्र.क्र.९७/इमा-१, दिनांक १९/१२/२०१९ च्या पत्रासह इतिवृत्त.

**शासन निर्णय :**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर्वोपचार रुग्णालय, बारामती येथे ५०० खाटांचे रुग्णालय परिसरात, वसतीगृहे व निवासस्थाने इमारतीस अंतर्गत इमारतीच्या फर्निचरच्या अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने तसेच शासकीय इमारतीच्या बांधकामास मंजूरी देणेबाबतच्या सचिव समितीच्या दिनांक १२.१२.२०१९ रोजी झालेल्या बैठकीच्या अनुषंगाने उपरोक्त पत्र दिनांक १९.१२.२०१९ अन्वये निर्गमित इतिवृत्तानुसार खालील तक्त्यात नमूद केलेल्या रुपये ५३,३६,००,०००/- (रुपये त्रेपण्ण कोटी छत्तीस लक्ष फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| अ.क्र. | बांधकामाचे नाव | सार्वजनिक बांधकाम विभाग व संबंधित समितीने सहमती दर्शविलेली प्रशासकीय मान्यता किंमत रुपये |
|---|---|---|
| १) | शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर्वोपचार रुग्णालय, बारामती येथे ५०० खाटांचे रुग्णालय परिसरात वसतीगृहे व निवासस्थाने इमारतीस अंतर्गत इमारतीच्या फर्निचरचे काम. | ५३,३६,००,०००/- |
| | एकूण | ५३,३६,००,०००/- |

सदर प्रशासकीय मान्यता खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे. :-

१) तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्र.२०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दिनांक ११/०४/२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

२) प्रस्तावातील खरेदीशी संबंधीत बाबींकरीता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दि.२४/०८/२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्रमांक: इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) विषयांकित कामाकरीता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

५) काम करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पुर्तता करुन घ्यावी. तसेच जागेची उपलब्धता, योग्यता व जागा पुरेशी आहे किंवा नाही याबाबतची खात्री संबंधीत संस्था प्रमुखांनी करावी.

६) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रके व दरपत्रके करुनच काम हाती घ्यावे.

७) प्रस्तुत काम अर्थसंकल्पाव्यतिरिक्त करावयाचे झाल्यास ५ टक्के सेंटेज चार्जेस मिळविण्यात यावेत.

८) संपूर्ण फर्निचर एकाच टप्यात कार्यान्वित करण्याऐवजी उपभोक्ता विभागाकडून टप्याटप्याने होणाऱ्या रुग्णालयाच्या परिणामकारक वापरानुसार फर्निचरची कामे एकाच वेळी हाती न घेता टप्याटप्याने हाती घेण्यात यावी .

९) सदर कामाबाबत सचिव (बांधकामे), मुख्य अभियंता व सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांची बैठक घेवून कामाचे नियोजन करण्यात यावे तसेच आवश्यकतेनुसार काम हाती घेण्यात यावे.

२. सदर कामासाठी निधीची तरतूद झाल्याशिवाय प्रत्यक्ष कामास सुरुवात करु नये. निधीची तरतूद झाल्यानंतर सदर काम हे खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षा अंतर्गत मंजूर तरतूदीतून करण्यात येईल.

मागणी क्रमांक - एच-८
४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च
०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन,
१०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत
(४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ नुसार वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका-१९७८, भाग पहिला, उप विभाग-५ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तीका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तीकेतील परिच्छेद क्रमांक १३४(१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३) यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१४२/इमा-३, दिनांक ०६/०७/२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीच्या तसेच शासकीय इमारतीच्या बांधकामास मंजूरी देणेबाबतच्या सचिव समितीच्या दिनांक १२.१२.२०१९ रोजी झालेल्या बैठकीच्या अनुषंगाने निर्गमित इतिवृत्तातील निर्देशानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१०८१८३२५३८३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN
MURLIDHARR
AO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, postalCode=400032,
street=MANTRALAYA ,MUMBAI,
serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f63f80f0bc4317129bf381eb48778f2e3d, ou=NA,
o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.01.09 10:07:51 +05'30'

(अ.मु.डहाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) महालेखापाल-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.

२) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव(वित्त) , वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
६) उप सचिव (इमारत) सार्वजनिक बांधकाम विभागमंत्रालय, मुंबई.
७) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
८) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे
९) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,पुणे
१०) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पूर्व विभाग) पुणे
११) अधिष्ठाता,शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, बारामती.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१३) निवडनस्ती (प्रशा-१).